**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या कार्यालयातील प्रबंधक व अतिरिक्त प्रबंधक पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**गृह (परिवहन) विभाग**

**शासन आदेश क्रमांक : एमसीटी-२०१६/प्र.क्र.११४/परिवहन-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१.४.२०१७

<u>शासन आदेश</u> :-

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या कार्यालयातील शिरस्तेदार/सहाय्यक प्रबंधक/अधीक्षक या संवर्गातील खालील कर्मचारी यांना गट-ब मधील प्रबंधक व अतिरिक्त प्रबंधक या संवर्गातील ( वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे ४६००) या एकाकी रिक्त पदांवर आदेशाच्या दिनांकापासून तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे व त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या कार्यालयातील रिक्त पदी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री. व्हि. डी. भारती | मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या कार्यालयातील प्रबंधक या रिक्त पदी |
| २ | श्री. ए.के. गायकवाड | मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या कार्यालयातील अतिरिक्त प्रबंधक या रिक्त पदी |

२. सदरहू पदोन्नती खालील अटी/शर्तींच्या अधीन देण्यात येत आहे.

अ) उपरोक्त अधिकाऱ्यांच्या तात्पुरत्या पदोन्नत्या या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

ब) प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त नमूद पदोन्नती ही प्रबंधक व अतिरिक्त प्रबंधक या पदाच्या सेवा प्रवेश नियमानुसार करण्यात आलेली आहे.

क) प्रबंधक व अतिरिक्त प्रबंधक हे स्वतंत्र संवर्ग असल्याने त्यांचे स्वतंत्र सेवाप्रवेश नियम तयार करण्याच्या अधीन पदोन्नती देण्यात येत आहे.

ड) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी वरील अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे.

इ) संक्रमण काळात कोणत्याही प्रकारची रजा मंजूर होणार नाही.

ई) आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०१७०४२११६४३०५२६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.04.21 16:44:37 +05'30'

**( द. ह. कदम )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. प्रधान सचिव (परिवहन व बंदरे) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
५. निवासी लेखाधिकारी, मुंबई
६. अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
७. पीठासन अधिकारी, राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, ठाणे / पुणे / नागपूर
९. संबंधित प्रबंधक व अतिरिक्त प्रबंधक व्दारा अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
१०. निवड नस्ती- परिवहन-५